**राज्यातील विविध वाहतूक संघटने व्दारे पुकारलेल्या संप/आंदोलनाच्या कालावधीत करावयाच्या उपाययोजना.**

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन परिपत्रक क्र.एमव्हीआर-०७१८/प्र.क्र.५०/शिकाना/परि-२

शिबीर कार्यालय, हैद्राबाद हाऊस, नागपूर.

दि.१९.०७.२०१८.

## परिपत्रक

**राज्यातील विविध वाहतूक संघटनेव्दारे त्यांच्या विविध मागण्यासाठी** संप/आंदोलन **करतात. अश्या** संप/आंदोलनामुळे माल/वस्तू/प्रवास इ. कारणास्तव राज्यातील सर्वसामान्य नागरिकांना नाहक त्रास सहन करावा लागतो. या कालावधीत सर्वसामान्य नागरिकांची गैरसोय होऊ नये याकरीता ऑल इंडीया मोटार ट्रान्सपोर्ट काँग्रेस या संघटनेने पुकारलेल्या ''चक्का जाम'' आंदोलनाच्या पार्श्वभूमीवर, सदरचे आंदोलन तसेच भविष्यातील वाहतूकदार संघटनांव्दारे उद्भवणारे आदोलन/संप इ. लक्षात घेवून उक्त आदोलन/संपाच्या कालावधीत स्थायी स्वरुपाची उपाययोजना करण्याकरीता विभागीय/क्षेत्रिय स्तरावरील करावयाच्या कार्यवाहीबाबत खालीलप्रमाणे परिपत्रकीय सूचना देण्यात येत आहेत.:-

१) संप/आंदोलनाच्या कालावधीत मोटार वाहन अधिनियम, १९८८ (१९८८ चा ५९) चे कलम ६६ चे उपकलम (३) चा खंड (एन) अन्वये प्राप्त असलेल्या अधिकारांचा वापर करून प्रवासी/माल वाहतूकीसंदर्भात शासनाव्दारे निर्गमित केलेल्या अधिसूचनेतील नमूद कालावधी, स्वरुप लक्षात घेवून पुढील कार्यवाहीबाबत नियोजन करण्यात यावे.

२) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, त्या-त्या परिक्षेत्रातील महानगरपालिकेच्या परिवहन उपक्रम यांनी त्यांच्या अधिनस्त असलेल्या बसेस संप कालावधीतील उपाययोजनेकरीता प्राथम्याने उपलब्ध करून दयाव्यात.

३) संप/आंदोलनाच्या कालावधीत निर्माण होणारी परिस्थिती तसेच कायदा व सुव्यवस्थेचा आढावा घेऊन प्रवाशांची व मालवाहतुकीच्या वितरणात होणारी गैरसोय, समस्या इ. बाबी विचारात घेऊन त्यावर आवश्यक उपाययोजना करणे, वाहतूक व्यवस्थेमध्ये समन्वय साधणे, कायदा व सुव्यवस्था अबाधित राखणे तसेच वेळोवेळी शासनाला माहिती उपलब्ध करून देण्यासाठी खालीलप्रमाणे जिल्हास्तरीय समिती गठीत करण्यात येत आहेत:-

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | जिल्हा पोलीस अधिक्षक/पोलीस उपआयुक्त किंवा त्यापेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी | सदस्य |
| ३ | महानगरपालिकेचे आयुक्तांनी नामनिर्देशित केलेले उपआयुक्त दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी | सदस्य |

| | | |
|---|---|---|
| ४ | जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था | सदस्य |
| ५ | विभाग नियंत्रक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ | सदस्य |
| ६ | जिल्हा समापदेशक, होमगार्ड | सदस्य |
| ७ | प्रादेशिक / उपप्रादेशिक परिवहन अधिकारी | सदस्य-सचिव |

४) संप/आंदोलन सुरु झाल्यापासून संपेपर्यंत या समितीच्या बैठका दररोज आयोजित करण्यात याव्यात. जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या अधिनस्त समन्वय अधिकारी (Nodal Officer) म्हणून नियुक्ती करून त्यांचे नाव व संपर्क दुरध्वनी क्रमांक याबाबतची माहिती शासनास तात्काळ कळवावी व त्यांच्या कार्यक्षेत्रातील आंदोलनासंबंधीचा अहवाल परिवहन विभागास तसेच मंत्रालय नियंत्रण कक्ष येथे दररोज सकाळी १०.०० व सायंकाळी ६.०० वाजता सादर करावा.

५) जिल्ह्याधिकाऱ्यांनी संपाबाबतची माहिती देण्यासाठी व संपाबाबतच्या उपाययोजना करण्यासाठी २४ तास कार्यरत राहील अश्या नियंत्रण कक्षाची स्थापना करावी. सदर नियंत्रण कक्षाव्दारे प्राप्त झालेली संपाबाबतची परिस्थिती व केलेल्या उपाययोजनांची सविस्तर माहिती जिल्हाधिकारी यांना सादर करावी. जिल्हाधिकारी यांनी सविस्तर अहवाल प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग यांना acs.transport@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर पाठवावा. तसेच सदर अहवालाची प्रत मंत्रालय नियंत्रण कक्षास कळविण्यात यावी.

६) जे वाहतुकदार/व्यावसायिक संपामध्ये सामिल होणार नाहीत अथवा होऊ इच्छित नाहीत अशा वाहतुकदारांना व्यवसाय करण्यास प्रेरीत करावे त्याचप्रमाणे त्यांच्या वाहनांना आवश्यक ते पोलीस संरक्षण पुरविण्याची व्यवस्था करावी.

७) दैनंदिन गरजेच्या वस्तू म्हणजे भाजीपाला, दूध, पेट्रोल, डिझेल, अन्नधान्य, औषधे व तत्सम जिवनोपयोगी वस्तूंच्या वाहतूकीची व्यवस्था प्राधान्याने करवून घ्यावी व याबाबतीत जिल्हाधिकाऱ्यांनी दररोज संबंधित अधिकाऱ्यांची बैठक घेऊन योग्य तो समन्वय ठेवावा तसेच संचालक, पणन यांनी याबाबत सुसूत्रिकरण करुन आवश्यक ती उपायोजना करावी.

८) बंदच्या परिस्थितीमुळे कोणत्याही परिस्थितीत जिवनाश्यक वस्तूंचा कृत्रिम तुटवडा निर्माण होणार नाही, याबाबत संबंधित जिल्हाधिकारी व जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी आवश्यक ती दक्षता घेवून त्वरीत उपाययोजना करावी.

९) जिल्हाधिकाऱ्यांनी आवश्यकतेप्रमाणे जिवनाश्यक वस्तूंच्या व अन्य वस्तूंच्या वाहतूकीसाठी शासकीय मालकीची मालवाहू वाहने व इतर वाहने अधिग्रहीत करून वापरात आणावित तसचे संपाच्या परिस्थिती लक्षात घेवून आवश्यकतेनूसार खाजगी वाहने देखील अधिग्रहीत करण्यास यावी.

१०) अन्न व नागरी पुरवठा विभागाने स्वयंपाकाचा गॅस, पेट्रोल, डिझेल, रॉकेल व अन्य इंधने त्याचप्रमाणे गोडतेल व तत्सम वस्तूंचा पुरवठा सुरळीत राहण्याकरीता तेल कंपन्यांशी समन्वय साधून आवश्यक ती उपाययोजना करावी.

११) संबंधित महसूल व पोलीस अधिकाऱ्यांनी त्या-त्या क्षेत्रातील रेल्वे अधिकाऱ्यांबरोबर समन्वय राखून भाजीपाला व तत्सम जिवनाश्यक वस्तूंच्या वाहतुकीबाबत रेल्वे अधिकाऱ्यांचे सहकार्य घ्यावे.

१२) केंद्र शासनाच्या अंगीकृत तेल कंपन्यांच्या अधिकाऱ्यांबरोबर समन्वय साधून ऑईल कंपनीच्या मालकीचे सर्व टँकर्स पूर्ण वापरात ठेवून पेट्रोलजन्य पदार्थांची वाहतुक सुरळीत ठेवता येईल, याबाबत आवश्यक ती उपाययोजना करावी.

१३) अधिग्रहीत केलेल्या वाहनांसाठी वाहनचालकांची कमतरता असल्यास वाहन चालविण्याची अनुज्ञप्ती असलेल्या व संबंधितास वाहने चालविण्याचा पुरेसा अनुभव असल्यास अश्या होमगार्ड, माजी सैनिकांच्या संस्था, राज्य राखीव दलाचे जवान अथवा उपलब्ध असल्यास पोलीस विभागातील जवान यांच्याव्दारे वाहतुक करण्यात यावी.

१४) राज्यातील सर्व प्रादेशिक व उपप्रादेशिक परिवहन अधिकाऱ्यांनी त्यांचे जिल्ह्यातील जिल्हाधिकारी, पोलीस अधीक्षक/उपायुक्त यांच्या संपर्कात राहून नियोजित बंदमुळे सामान्य जनजिवन विस्कळीत होणार नाही यासाठी आवश्यक उपाययोजना करावी. तसेच उपलब्ध दैनिक माहिती परिवहन आयुक्त कार्यालय यांना tcmaharashtra@yahoo.com या ई-मेल पत्त्यावर पाठवावी.

१५) संप/आंदोलनाच्या काळात जिवनाश्यक वस्तूंची वाहतुक करणाऱ्या सर्व वाहनांना ज्या ठिकाणाहून वाहतुकीला सुरवात होईल, त्या ठिकाणापासून अंतिम ठिकाणा पर्यंत पुरेसे पोलीस संरक्षण देण्याची व्यवस्था संबंधित पोलीस अधीक्षक /पोलीस उपायुक्त यांनी करावी.

१६) संप/आंदोलनाच्या काळात स्थानिक वर्तमान पत्रातून शासनाने केलेल्या उपाययोजनांची त्याचप्रमाणे जिवनाश्यक वस्तूंच्या भावाबाबतची माहिती यास जिल्हा माहिती अधिकारी यांनी जिल्हाधिकारी यांचेशी चर्चा करून दररोज व्यापक स्वरूपात प्रसिध्दी द्यावी.

१७) संप/आंदोलनाच्या काळात आपल्या कार्यक्षेत्रात कोणताही अनुचित प्रकार घडणार नाही, याची स्थानिक प्रशासनाने दक्षता घ्यावी.

१८) विभागीय स्तरावर विभागीय आयुक्तांनी सर्व प्रादेशिक विभाग प्रमुखांच्या सहकार्याने वरील सर्व बाबींचे प्रभावीपणे समन्वय करण्यात यावे.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०७१९१५४७२००९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Ashish Kumar Singh

Digitally signed by Ashish Kumar Singh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6399d1674d200923dae5766f52f1749e562f0390a4b158b702edba1c7269290a, cn=Ashish Kumar Singh
Date: 2018.07.19 15:56:40 +05'30'

**(आशिष कुमार सिंह)**
प्रधान सचिव (परिवहन व बंदरे), गृह विभाग

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधानसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, नागपूर.
३. सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, नागपूर.
४. मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, नागपूर.
५. मा.सभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, नागपूर.
६. मा.उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधानभवन, नागपूर.
७. मा.उपसभापती, विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधानभवन, नागपूर.
८. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधानभवन, नागपूर.
९. मा.विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, नागपूर.
१०.मा.संसद सदस्य (महाराष्ट्र राज्य)
११.मा.विधानसभा सदस्य (सर्व), विधान भवन, नागपूर.
१२.मा.विधानपरिषद सदस्य (सर्व), विधान भवन, नागपूर.
१३.मा.मुख्य सचिव, नागपूर.
१४.सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, नागपूर.
१५.परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१६.महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१७.महाव्यवस्थापक, बृहन्मुंबई परिवहन उपक्रम, मुंबई.
१८. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१९.सर्व विभागीय आयुक्त
२०.सर्व जिल्हाधिकारी
२१.सर्व पोलिस आयुक्त
२२.सर्व जिल्हा पोलिस अधीक्षक/उपायुक्त, महाराष्ट्र राज्य
२३.सर्व अध्यक्ष/ सचिव/ सदस्य परिवहन प्राधिकरण
२४.सर्व प्रादेशिक/उप प्रादेशिक परिवहन अधिकारी
२५.निवडनस्ती (परि-२).